**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांचा पुरवठा करणे या योजनेसाठी सन २०२३-२४ या वर्षात अर्थसंकल्पिय तरतुदीपैकी बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी खर्च करण्यासाठी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन ज्ञापन, क्रमांक: एसटीएस-२०२३/प्र. क्र. ५९२ /अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २९ मार्च, २०२४.

**वाचा** : शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक १२ एप्रिल, २०२३.

**ज्ञापन :**

आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात येत आहे की, अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांचा पुरवठा करणे या योजनेसाठी सन २०२३-२४ या वर्षात अर्थसंकल्पिय तरतुदीपैकी उपरोक्त वाचा येथील शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पिय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स/BEAMS) उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी खर्च करण्यासाठी या ज्ञापनाद्वारे वितरीत करण्यात येत आहे, याबाबतचे विवरण खालीलप्रमाणे आहे:

**(रुपये कोटीत)**

| अ. क्र. | अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांचा पुरवठा करण्याची योजना | अर्थसंकल्पिय तरतूद रुपये | खर्च करण्यासाठी वितरीत करण्यात येत असलेला निधी रुपये |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | २२२५,<br>३१,सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)<br>२२२५ D ३३१ | १४.००<br>(अक्षरी रुपये चौदा कोटी फक्त) | ५.००<br>(अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) |

२. सदर निधी खर्च करण्यासाठी आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व संबंधित जिल्ह्याचे सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. नियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील रकाना ४ मधील निधी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चूकता शासनास सादर करण्यात यावे.

४. उपरोक्त वाचा येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील नमूद केलेल्या प्रत्येक बाबीची पूर्तता झालेली आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत योजनेवर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२३-२४ या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा:

मागणी क्रमांक एन-३
मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण
०१, अनुसूचित जातींचे कल्याण
(०४) अवजारे व यंत्रसामुग्रीकरीता अर्थसहाय्य पुरविणे
(०४) (०१) बचत गटांना मिनीट्रॅक्टर घेण्यासाठी अर्थसहाय्य. (कार्यक्रम)
३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)
२२२५ डी ३३१

६. नियंत्रण अधिकारी यांनी खर्च करताना उपरोक्त वाचा येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील प्रत्येक बाबींची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी. तसेच, वित्तीय अधिकारांतर्गत महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिकेत विहित केलेल्या अटींनुसार सदर निधी खर्च करताना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी नियंत्रण अधिकारी यांची राहिल. सदर निधी वितरीत करताना आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासणीच्या अधिन राहून निधी वितरीत करावा.

७. सदर शासन ज्ञापन उपरोक्त वाचा येथील शासन परिपत्रकान्वये विभागास प्राप्त अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३२९१४५०१०६७२२ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN VILAS SHISHUPAL

Digitally signed by PRAVIN VILAS SHISHUPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=e90b11f238d671a8222f53575baf1f02e1625f1f53f35c695b531bcd5b6b83fa, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CBD05D0EA86861C0C1248FD89817636DDFBE5E50BA12759A0FE7E022D790310B, cn=PRAVIN VILAS SHISHUPAL
Date: 2024.03.29 15:00:25 +05'30'

**( प्रविण शिशुपाल )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, सर्व.

**प्रत,**

१. प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, सर्व.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
६. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती /अजाक.